विषय:- मुंबई विक्रीकर अधिनियम १९५९ च्या अनुसूची सी-दोन-१४ मध्ये उल्लेख केलेल्या रेस्टॉरन्ट व्यवसायावरील उलाढाल कर व अधिभार यांचा भरणा न केल्यामुळे येणारे व्याज व शास्ती माफ करणेबाबत.

---

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-विकअ-२००४/प्रक्र.५५/कराधान-२**
**मंत्रालय,मुंबई-४०००३२,**
**दिनांक:- २६ ऑक्टोबर २००४.**

**प्रस्तावना:**

मुंबई विक्रीकर अधिनियम, १९५९ खाली ३०.९.१९९५ अखेर उलाढाल कर व अतिरिक्त कर देय होते. १.१०.१९९५ ते ३१.३.१९९९ या कालावधीत मूल्यवर्धित कर प्रणालीमुळे उलाढालकर व अधिभार देय नव्हते. शासनाने १.४.१९९९ पासून सदर कर (उलाढालकर व अधिभार) पुन:श्च लागू केले व उलाढालकर तसेच अधिभार स्वतंत्ररित्या गोळा करण्याची तरतूदही करण्यात आली. अधिसूचना गट अ, नोंद क्र.१३ नुसार रेस्टॉरन्ट व्यावसायिकांना उलाढालीच्या प्रमाणात विक्रीकराची करदेयता ठरविण्यात आली आहे. त्यानुसार अनेक रेस्टॉरन्ट व्यावसायिकांनी विक्रीकर भरणा केला. तथापि, १.४.१९९९ पासून देय झालेला उलाढालकर व अधिभार यांचा भरणा करणे क्रमप्राप्त असून देखील केला नाही. कायद्यातील या बदलामुळे विवरणपत्रकांसोबत न भरलेल्या उलाढालकर व अधिभार यांच्या रकमेवर अनेक प्रकरणात व्याज व शास्ती आकारण्यात आली आहे.

२. रेस्टॉरन्ट व्यवसायिक हे त्यांच्या उलाढालीनुसार कर भरत असल्याने दिनांक १.४.१९९९ पासून उलाढालकर आणि अधिभार कर भरण्यास पात्र नाहीत, अशी अनेक रेस्टॉरन्ट व्यवसायिकांची धारणा होती. त्यामुळे त्यांनी उलाढालकर व अधिभार यांची रक्कम भरलेली नव्हती. त्यांना उचित प्रशासकीय सवलत मिळावी अशी मागणी होती. उपरोक्त मागणी शासनाच्या विचाराधीन होती आणि उलाढालकर आणि अधिभार यांच्या थकबाकीच्या प्रमाणात येणा-या व्याज व शास्ती माफीना प्रशासकीय सवलतीद्वारे माफ करण्याचा प्रस्ताव विचाराधीन होता. या अनुषंगाने सन २००४-२००५ या वर्षाचा अतिरिक्त अर्थसंकल्प विधानसभेला सादर करताना मा.वित्तमंत्री महोदयांनी केलेल्या भाषणात अशा प्रकारची प्रशासकीय सवलत देण्याचे घोषित केले. त्यानुसार शासन पुढीलप्रमाणे निर्णय जाहीर करीत आहे :-

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र शासन खालीलप्रमाणे सवलत मंजूर करीत आहे :-

अ) अनुसूची सी-दोन-१४ मध्ये उल्लेख केलेल्या रेस्टॉरन्ट व्यवसायिकांच्या व्यवसायावरील (क्लबमध्ये असणारे रेस्टॉरन्ट तसेच तारांकित हॉटेल्सचे रेस्टॉरन्ट /पब व्यतिरिक्त) १ एप्रिल १९९९ ते ३१ मार्च २००४ या कालावधीसाठी उलाढाल कर व अधिभार थकबाकीच्या संदर्भात थकबाकीच्या प्रमाणात येणा-या व्याज आणि शास्तीच्या रकमेत प्रशासकीय सवलतीद्वारे सूट देण्यात येत आहे.

ब) सदर प्रशासकीय सवलतीचा लाभ घेणा-या व्यापा-याने दिनांक १ एप्रिल १९९९ ते ३१ मार्च २००४ पर्यंतच्या कालावधीचे कायदेशीररृष्ट्या देय असलेले (उलाढाल कर व अधिभार यांचेसहित) सर्व कर दिनांक ३० सप्टेंबर २००४ पूर्वी भरलेले असले पाहिजेत.

३. प्रशासकीय सवलतीचा लाभ घेणा-या व्यापा-यास प्रशासकीय सवलत देण्याचे अधिकार, विक्रीकर आयुक्तांना देण्यात आले आहेत. आवश्यकतेनुसार सदर अधिकार आयुक्तांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील अपर विक्रीकर आयुक्त, विक्रीकर उपआयुक्त (प्रशासन), सहाय्यक विक्रीकर आयुक्त (प्रशासन) यांना प्रदान करण्याची परवानगी देण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

मृ.गो.कोटनाके
शासनाचे अवर सचिव

प्रत,

माहितीसाठी व आवश्यक त्या कार्यवाहीसाठी अग्रेषित.

१. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा व परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
३. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, विक्रीकर भवन, ८ वा मजला,माझगांव,मुंबई-४०००१०
५. अध्यक्ष, महाराष्ट्र विक्रीकर न्यायाधिकरण, माझगांव, मुंबई-४०००१०
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. निवासी लेखा परीक्षक, मुंबई.
८. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई
९. कार्यासन अधिकारी, कराधान-३, वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई.
१०. निवड नस्ती, कराधान-२.